पूर्व विदर्भातील माजी मालगुजारी तलावांची दुरुस्ती
व सिंचन क्षमतेची पुनर्स्थापना करण्याबाबतच्या कामांना
प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार
विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्रमांक मामात २०१०/ (२६८/१०)/ सिंव्य कामे
जलसंपदा विभाग, मंत्रालय,
शिबीर कार्यालय, नागपूर-४४०००१.
दिनांक - ३० नोव्हेंबर २०१०.

वाचावे -

१. शासन निर्णय क्रमांक महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प १००६/ (६८८/ ०६)/ लाक्षेवि कामे दिनांक १४-६-२००७.
२. शासन निर्णय क्रमांक पावास १००७/ (३२३/ ०७)/ सिंव्य धो, दिनांक २२-६-२००७.
३. शासन निर्णय क्रमांक मामातलाव २००८/ (२९२/ ०८)/ सिंव्य कामे, दिनांक १७-७-२००८.
४. शासन परिपत्रक क्रमांक सीडीए १००९/ (१४३/ ०९)/ लाक्षेवि कामे दिनांक ६-२-२०१०.

प्रस्तावना -

डिसेंबर, २००७ मध्ये राज्यातील माजी मालगुजारी तलावांच्या दुरावस्थेची कारणे शोधणे व त्यांची दुरुस्ती करुन सिंचन प्रणाली सुरळीत करणे यासाठी श्री. रा. ब. शुक्ला, मुख्य अभियंता, महाराष्ट्र जलसंपत्ती विकास केंद्र, औरंगाबाद यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली होती. या समितीने माजी मालगुजारी तलावांच्या दुरुस्तीसाठी सुचविलेल्या रुपये २१,०००/- प्रती हेक्टर मापदंडास शासनाने संदर्भीय शासन निर्णय क्रमांक ३ अन्वये मान्यता दिलेली आहे. तसेच जलसंपदा विभागाने त्यांच्या नियंत्रणाखाली सर्व माजी मालगुजारी तलावांची दुरुस्ती करण्याचा कार्यक्रम हाती घ्यावा असे सुचविले आहे. मापदंडात बसणा-या तलावांच्या दुरूस्तीचा कार्यक्रम तीन वर्षात पूर्ण व्हावा असे शासन निर्णयात नमूद केलेले आहे.

वर नमूद केलेली कामे ठरविलेल्या कालावधीत पूर्ण व्हावीत म्हणून माजी मालगुजारी तलावांची दुरुस्ती व सिंचन क्षमतेच्या पुनर्स्थापनेच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय -

जलसंपदा विभागांतर्गत असलेल्या विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास त्यांच्या कार्यक्षेत्रांतर्गत जलसंपदा विभागाच्या माजी मालगुजारी तलावांची दुरुस्ती व सिंचन क्षमतेची पुनर्स्थापना याकरिता लागणा-या कामांना रुपये १ कोटीच्या मर्यादेपर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार काही अटींच्या अधिन राहून प्रदान करण्यात येत आहेत.

या अधिकांराचा वापर करुन उपरोक्त नमूद कामांना प्रचलित आर्थिक मापदंडाच्या मर्यादेत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यापूर्वी पुढील अटींची पूर्तता करणे बंधनकारक आहे.

१) प्रशासकीय मान्यता योजनांतर्गत लेखाशिर्षाखाली देण्यात यावी.
२) दुरुस्ती करण्यापूर्वी महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतक-यांकडून व्यवस्थापन अधिनियम, २००५ खाली सर्व तलाव अधिसूचित करावेत. अधिसूचना १, २ व ३ निघाल्याशिवाय कामे हाती घेवू नयेत. तसेच या कायद्याची सर्व कलमे या प्रकल्पांना लागू करावीत.

३) या तलावांच्या दुरुस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता देतांना शासनाने सदर तलावांच्या दुरुस्तीसाठी शासन निर्णय क्रमांक मामातलाव २००८/ (२९२/ ०८)/ सिंव्य कामे दिनांक १७-७-२००८ अन्वये निश्चित केलेल्या रुपये २१,०००/- प्रती हेक्टर या मापदंडाच्या अधिन राहून देण्यात याव्यात.

४) अनावर्ती खर्चाचे रुपये १ कोटीच्या मर्यादेच्या वरील प्रस्ताव शासनास मंजूरीसाठी सादर करण्यात यावेत.

५) दुरुस्तीच्या कामांची किंमत प्रती हेक्टर वर आधारित परिगणीत करुन विशेष दुरुस्तीच्या कामाचा चढता क्रम (Ascending order) लावून कमी खर्चाच्या योजना प्राथम्याने हाती घेण्यात याव्यात व त्या दृष्टीने कामाचे वार्षिक नियोजन करावे.

६) प्रत्येक मालगुजारी तलावाची दुरुस्ती करतांना शासनाने वाचावे क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेली कंत्राट व्यवस्थापन समिती स्थापन करावी.

७) सदर तलाव दुरुस्तीनंतर लाभधारकांच्या पाणी वापर संस्थांना हस्तांतरित करण्यात यावेत.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४०५/ व्यय १२ दिनांक २९-११-२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१०११३०२३५७४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सं. दे. कुलकर्णी)
शासनाचे उप सचिव.

प्रत,

१) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मा. मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मा. उपमुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (जलसंपदा) (कृखोपाम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्य मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
७) महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
९) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई.
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१४) सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे.
१७) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१९) सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२१) सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) सर्व कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) निवड नस्ती कार्यासन सिंव्य कामे.